**सांस्कृतिक कार्य विभागामार्फत आयोजित होणाऱ्या शासनाचा "आंतरराष्ट्रीय मराठी चित्रपट महोत्सव" आयोजन खर्चास वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : आंचिम-२०२५/प्र.क्र.१८/सां.का.१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३०
दिनांक : ३१ मार्च , २०२५

**वाचा :** १. महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई यांचे पत्र क्र.संकीर्ण-२०२४/म.चि.म./ज.वि./२१/९५, दि.१३ मार्च, २०२५ .
२. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. आंचिम-२०२५/प्र.क्र.१८/ सां.का.१, दि. २८ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :**

"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" च्या अनुषंगाने विविध नाविन्यपूर्ण उपक्रम / कार्यक्रम राबविण्यास सुरुवात करण्यात आली आहे. त्याच पार्श्वभूमीवर विभागामार्फत शासनाच्या आंतरराष्ट्रीय मराठी चित्रपट महोत्सवाचे आयोजन करण्याचे नजीकच्या काळात प्रस्तावित आहे. सदर प्रयोजनार्थ होणाऱ्या खर्चास संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर निधीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" च्या अनुषंगाने नजीकच्या काळात आयोजित करण्यात येणाऱ्या शासनाच्या "आंतरराष्ट्रीय मराठी चित्रपट महोत्सव" आयोजनाकरीता होणाऱ्या खर्चासाठी रुपये २,००,००,०००.००/- (अक्षरी रुपये दोन कोटी फक्त) इतक्या रकमेची प्रतिपूर्ती करण्यासाठी महामंडळास या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** सदरचा महोत्सव आयोजनाची जबाबदारी व संनियंत्रण महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई यांचे असेल. तसेच, या प्रयोजनार्थ महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई यांनी शासनाकडून प्रतिपूर्ती होईपर्यंत स्वनिधीतून खर्च भागविण्यात यावा.

**०३.** यासाठी होणारा खर्च " मागणी क्रमांक झेडडी-२ २२०५, कला व संस्कृती १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०३) (०६) आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव (२२०५ १५८१) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा. सदरचा निधी सशर्त आहे.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग तीन अ.क्र.४ नियम क्र.२७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागास प्राप्त प्राधिकारानुसार काढण्यात येत आहे.

०५. या प्रयोजनार्थ वितरित निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास सादर करणे बंधनकारक राहिल. यासाठी, उप सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून अवर सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांना सदर रक्कम एकरकमी वितरित करावी. यासाठी, उप सचिव (सां.का.१) हे पर्यवेक्षीय अधिकारी राहतील.

०६. सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२९१/२०२५/व्यय-१५, दि.३१ मार्च, २०२५ अन्वये प्राप्त मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३१२१४८४६२१२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2025.03.31 21:49:39 +05'30'

**( अनिरुध्द सू. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग (व्यय-१५, अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई- यांना विनंती करण्यात येते की, उक्त अनुदानाची रक्कम BDS द्वारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाही करण्यात यावी.

११.अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई- यांना विनंती करण्यात येते की,सदर शासन निर्णयातील नमूद रक्कम व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई यांच्या नावे वितरित करण्यात यावी.

१२.निवडनस्ती (सां.का.१).